राज्यातील खाजगी अनुदानित सैनिकी शाळांसाठी स्वंतत्र नियमावली तयार करण्यासंदर्भात समिती घटित करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्र. सैशानि-२०१८/प्र.क्र.२४/एसएम-६**
मंत्रालय विस्तार सदन, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- १४ जानेवारी, २०१९

वाचा : शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्रमांक : इसैशा १०९५/ (२७८/९५)/ माशि-८ दिनांक २६ सप्टेंबर, १९९५

प्रस्तावना :

राज्यात प्रत्येक जिल्हयात एक अशा ३० सैनिकी शिक्षण देणाऱ्या शाळा/स्वयंसेवी संस्थांना १९९६-९७ पासून उघडण्यास संदर्भाधीन दिनांक २६ सप्टेंबर, १९९५ च्या शासन निर्णयान्वये परवानगी देण्यात आली आहे. या योजनेनुसार खाजगी, सक्षम व स्वयंसेवी संस्थामार्फत जिल्हयाच्या ठिकाणी मुलांची एक सैनिकी शाळा सुरु करण्याचा व प्रत्येक महसूली विभागात एक मुलींची सैनिकी शाळा सुरु करणेबाबतचा धोरणात्मक निर्णय शासन स्तरावर घेण्यात आला आहे. ह्या शाळा संपूर्णत: निवासी शाळा असून सदयस्थितीत राज्यात ३९ अनुदानित व ३ विना-अनुदानित सैनिकी शाळा कार्यरत आहेत.

सातारा सैनिकी शाळेच्या धर्तीवर राज्यातील खाजगी संस्थांच्या अनुदानित सैनिकी शाळांसाठी स्वतंत्र नियमावली लागू करण्यात आली तर त्यांचा दर्जा उंचावण्यास सहाय्य होईल व या शाळांमधून राष्ट्रीय संरक्षण प्रबोधिनीमध्ये जास्तीत जास्त विद्यार्थी दाखल होऊ शकतील. या उद्देशाने राज्यातील खाजगी संस्थांच्या अनुदानित सैनिकी शाळांसाठी स्वतंत्र नियमावली तयार करण्यासाठी समिती घटित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :

१. सातारा सैनिकी शाळेच्या धर्तीवर खाजगी संस्थांच्या अनुदानित सैनिकी शाळांसाठी स्वतंत्र नियमावली तयार करण्यासंदर्भात आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या अध्यक्षतेखाली खालीलप्रमाणे समिती घटित करण्यात येत आहे:-

| अ.क्र. | पदनाम | समितीमध्ये धारण केलेले पद |
|---|---|---|
| १ | आयुक्त (शिक्षण),महाराष्ट्र राज्य,पुणे | अध्यक्ष |
| २ | शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), शिक्षण संचालनालय, पुणे | सदस्य |
| ३ | सहसंचालक (माध्यमिक), शिक्षण संचालनालय , पुणे | सदस्य |
| ४ | विभागीय शिक्षण उप संचालक, पुणे विभाग, पुणे | सदस्य |
| ५ | शिक्षणाधिकारी (माध्यमिक), जिल्हा परिषद, सातारा | सदस्य सचिव |

२. समितीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे राहिल :-

"राज्यातील खाजगी संस्थांच्या अनुदानित सैनिकी शाळांसाठी स्वतंत्र नियमावली तयार करण्याच्या अनुषंगाने सर्वसमावेशक अहवाल तयार करुन शासनास सादर करणे."

३. सदर समितीने आपला अहवाल दोन महिन्याच्या मुदतीत सादर करावा.

४. महाराष्ट्र राज्य सैनिकी शाळा असोसिएशनचे २ पदाधिकारी यांना वरील समितीच्या बैठकीस आमंत्रित करुन त्यांचे म्हणणे मांडण्याची तसेच निवेदन सादर करण्याची संधी देण्यात यावी. त्यांनी बैठकीत निदर्शनास आणलेल्या बाबी, त्यांच्या निवेदनातील बाबी याचा अभ्यास करुन समितीस योग्य ती शिफारस करता येईल. महाराष्ट्र राज्य सैनिकी शाळा असोसिएशनने संबंधित २ पदाधिका-यांची नांवे सदर समितीस सादर करावीत.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१९०११४१६४६३५१४२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Swati Madhukar Nanal

Digitally signed by Swati Madhukar Nanal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=82e1d6f07c5cabf5884958ee70015d36b35b2c07e9700fe62cba2439a81b4be4, serialNumber=007d84f8ce44beba86b0ca2d0155d67cc1a9db4f8d59bc9d8067628d62bcdc1a, cn=Swati Madhukar Nanal
Date: 2019.01.14 16:57:48 +05'30'

**( स्वाती म. नानल )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
२. शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
३. सहसंचालक (माध्यमिक), शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
४. विभागीय शिक्षण उपसंचालक, पुणे विभाग, पुणे
५. शिक्षणाधिकारी (माध्यमिक), जिल्हा परिषद, सातारा
६. निवड नस्ती, एसएम-६

**प्रत:-**

१. मंत्री (शालेय शिक्षण) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय,मुंबई ३२
२. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई ३२.